**आदिवासी भागात नवसंजीवन योजना अंमलबजावणी व संनियंत्रण करण्यासाठी उच्च स्तरीय समितीची स्थापना**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-कुपोनि-२००४/प्र.क्र. ८७/का.८**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १९ जुलै, २००४.**

**वाचा** :- १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एबावि-१०९४/ प्र.क्र.१/ ९४/ का.२१, दिनांक २४.१.१९९४

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. टिएसपी-१०९५/ प्र.क्र.६/का.६, दिनांक २२.६.१९९५

**प्रस्तावना :-** मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी बालमृत्यूच्या संदर्भात विविध वर्तमानपत्रात प्रसिध्द झालेल्या बातमीच्या अनुषंगाने स्वतःहून रिट याचिका क्र.५६२९/२००४ दाखल करुन घेतली होती. या याचिकेवर दि.८.७.२००४ रोजी सुनावणी होवून मा. उच्च न्यायालयाने शासनास अल्पकालीन व दिर्घकालीन करावयाच्या उपाययोजनांबाबत निर्देश दिलेले आहेत. त्यास अनुसरुन राज्यात आदिवासी भागात नवसंजीवन योजनेची अंमलबजावणी आणि संनियंत्रण करण्यासाठी उच्चस्तरीय समितीची स्थापना करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- आदिवासीच्या आरोग्यात सुधारणा करणे, त्यांना आरोग्यविषयक सुविधा पुरविणे, वर्षभर पुरेल एवढा रोजगार उपलब्ध करणे, पिण्याचे शुध्द व पुरेसे पाणी उपलब्ध करुन देणे, अन्नधान्य पुरवठा सुनिश्चित करुन पूरक आहार देणे, या सर्व उपाययोजनांव्दारे आदिवासींचे क्रियाशील आयुष्य वाढविणे, याकरिता नवसंजीवन योजना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.-टिएसपी-१०९५/ प्र.क्र.६/का.६, दि. २२ जून, १९९५ अन्वये अंमलात आलेली आहे. सदरहू योजना आदिवासी उपयोजना क्षेत्रातील १५ जिल्हे व त्या जिल्हयातील अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्र, माडा व मिनीमाडा या क्षेत्रात राबविण्यात येत आहे. नवसंजीवन योजनेबाबत मुख्य अंमलबजावणी अधिकारी म्हणून सदरहू जिल्हयाच्या जिल्हाधिकाऱ्यांना घोषित केलेले आहे व ते जिल्हयातील इतर संबंधित अधिकाऱ्यांच्या कार्यावर संनियंत्रण ठेवतील अशी तरतूद वरील शासन निर्णयामध्ये केलेली आहे. आता या शासन निर्णयाव्दारे नवसंजीवन योजनेंतर्गत समाविष्ट असलेल्या घटक योजनांची अंमलबजावणी, संनियंत्रण व आढावा घेण्याकरिता पुढीलप्रमाणे "उच्चस्तरीय समिती" स्थापन करण्यास शासन या शासन निर्णयांन्वये मान्यता देत आहे :-

(१) **उच्चस्तरीय समितीची रचना पुढीलप्रमाणे असेल :-**

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (नियोजन) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (आरोग्य) | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव (वित्त) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव ,ग्राम विकास विभाग | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव/ सचिव, नियोजन विभाग (रो.ह.यो.) | सदस्य |
| ८ | प्रधान सचिव/ सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| ९ | प्रधान सचिव, अन्न व नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण | सदस्य |
| १० | प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (महसूल) | सदस्य |
| ११ | प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (वने) | सदस्य |
| १२ | महासंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | मानद सदस्य |
| १३ | डॉ. अभय बंग,सर्च, गडचिरोली | अशासकीय मानद सदस्य |
| १४ | प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य सचिव |

आवश्यकते प्रमाणे इतर संबंधित विभागांच्या सचिवांना/क्षेत्रीय अधिकाऱ्यांना उक्त समितीच्या कोणत्याही बैठकीस विशेष निमंत्रित म्हणून पाचारण करण्यात येईल.

(२) **उच्चस्तरीय समितीची कार्यकक्षा :-**

मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या दि.८ जुलै, २००४ च्या निदेशानुसार या समितीने खालीलप्रमाणे कामकाज करावयाचे आहे :-

**(एक)** या समितीचे प्रमुख कार्य हे धोरण ठरविणे, अर्थसंकल्पिय तरतूदी सूचविणे आणि जिल्हा व गाव पातळीवरील कार्यक्रमाचे सुव्यवस्थित संनियंत्रण करणे, असे राहील. प्रत्येक विभागाने त्यांच्याशी संबंधित कार्यक्रमाची तपासणी सूची तयार करुन उच्चस्तरीय समितीकडे मंजूरीसाठी सादर करणे आवश्यक राहील..

**(दोन)** उच्चस्तरीय समिती किमान पुढील ५ वर्षासाठी १५ जिल्हयांना लागू होणारी एक सर्वंकष नवसंजीवन योजना तयार करील व मा.उच्च न्यायालयासमोर ३ महिन्याच्या आत सादर करील.

**(तीन)** दरम्यानच्या काळात, सध्या सुरु असलेल्या सर्व नियमित योजना पूर्ण जोमाने, विशेषत: नाशिक, नंदूरबार, अमरावती, ठाणे व गडचिरोली जिल्हयात राबवितण्यात येतील व त्यासाठी आवश्यक तो निधी वितरित करण्यात येईल.

**(चार)** (अ) उच्चस्तरीय समिती निधी वितरणात प्रशासकीय बाबी व कार्यपध्दतीमुळे विलंब होणार नाही, याची दक्षता घेईल व त्यासाठी आवश्यक उपाययोजना अंमलात आणील.

(ब) वर्ग-३ व ४ ची रिक्त पदे भरण्यासाठी अटी व शर्ती शिथिल करण्याची गरज भासल्यास त्याबाबत निर्णय घेईल.

**(पाच)** या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील बाबींची अंमलबाजावणी परिणामकारकरित्या व योग्य तऱ्हेने होत आहे याची दक्षता घेईल व संनियंत्रण ठेवील.

५. अशासकीय सदस्यांना सदरहू बैठकीस दैनिक भत्ता व प्रवासभत्ता नियमानुसार देय असेल त्यानुसार अदा करण्याची कार्यवाही संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( अ. नि. कुलकर्णी )**
**उप सचिव**

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव, महाराष्ट्र राज्य
मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य
सर्व मंत्री/ राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
सर्व अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
सर्व प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (महसूल) , मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (वने) , मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव, महिला व बालकल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव, अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सर्व विभागीय आयुक्त (महसूल)

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा, नवी मुंबई.
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास,
महासंचालक, आरोग्य संचालनालय, मुंबई
संचालक, माहिती व प्रसिध्दी संचालनालय,मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.)
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा ), मुंबई/ नागपूर
डॉ. अभय बंग, "सर्च", चातगांव, गडचिरोली (पत्राने)
निवड नस्ती (का.८)

# प रि शि ष्ट - अ

## शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : कुपोनि-२००४/प्र.क्र.८७/का.८, दिनांक १९ जुलै, २००४ च्या परिच्छेद (२)(पाच) संबंधी परिशिष्ट

(एक) सर्व ग्रामपंचायतींना ब्लिचिंग पावडर उपलब्ध आहे आणि गाव/ पाडयातील पाण्याचे निर्जंतुकीकरण नियमितरित्या केले जात आहे.

(दोन) आदिवासी क्षेत्रात पुरेसा धान्य साठा उपलब्ध आहे.

(तीन) सर्व लाभार्थ्यांना पुरेशा प्रमाणात पूरक पोषण आहार उपलब्ध करण्यात येत आहे.

(चार) वरील ५ जिल्हयातील प्रत्येक गावातील ० ते ६ वयोगटातील सर्व बालकांची नियमित व ठराविक काळात (Periodically) वैद्यकीय तपासणी करण्यात येत आहे.

(पाच) अत्यावश्यक, जीवन रक्षक व तातडीच्या औषधांचा पुरेसा साठा आदिवासी भागातील आरोग्य संस्थेत उपलब्ध आहे.

(सहा) तज्ज्ञ संवर्गातील पदे विशेषतः स्त्रीरोग तज्ज्ञ व बालरोग तज्ज्ञ यांची पदे सर्व ५ जिल्हयात उपलब्ध व भरलेली आहेत, व ही पदे रिक्त असल्यास दोन आठवडयात भरण्याची कार्यवाही करण्यात येईल.

(सात) प्रत्येक खेडयासाठी प्रशिक्षित दाई आहे.

(आठ) आदिवासी भागात विहित मानकाप्रमाणे आरोग्य संस्था मंजूर करण्यात आल्या आहेत.

(नऊ) आदिवासी भागात रोजगार हमी योजना राबविण्यात येत आहे.

(दहा) पाडा स्वयंसेवक आणि फिरत्या पथकाच्या १००% नेमणूका झाल्या आहेत.

(अकरा) श्रेणी-३ व ४ मधील सर्व बालकांना दवाखान्यात हलवून त्यांना आंतररुग्ण सेवा व तातडीचा औषधोपचार देण्यात येत आहे.

(बारा) डॉ.बंग यांच्या संस्थेने विकसित केलेली "स्त्री आरोग्य सेविका" पध्दत सर्व गावांत स्वयंसेवी संस्था, अशासकीय संस्थांमार्फत राबविण्यात येत आहे.

*******